**अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांच्या मान्यतेस अनुसरुन शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून कोल्हापूर येथे नवीन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय सुरु करण्यास मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२३/प्र.क्र.६०/तांशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २८ जून, २०२३.

**वाचा :-** १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्र.मान्यता-२०२२/प्र.क्र.२०२/तांशि-४, दि.२७.०३.२०२३
२) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. वेस्टर्न/२०२३-२४/ १-४३३६३६६०२७४, दि.१०.०६.२०२३.
३) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्र.२/एनजीसी/न.शा.अ.म./२०२३ /५५१, दि.१९.०६.२०२३.

**प्रस्तावना:-** अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी त्यांच्या वर नमूद क्र.२ येथील दि.१०.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन व संचालक, तंत्र शिक्षण यांनी त्यांच्या वर नमूद क्र.३ येथील दि.१९.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे कोल्हापूर येथे प्रत्येकी ६० प्रवेश क्षमतेच्या ५ अभ्यासक्रमांसह नवीन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय सुरु करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय:-** अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन व संचालक तंत्र शिक्षण यांनी प्रस्तावित केल्यानुसार शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून कोल्हापूर येथे नवीन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय सुरु करण्यास तक्त्यामध्ये दर्शविल्याप्रमाणे खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | महाविद्यालये नांव व पत्ता | अभ्यासक्रमाचे नांव | प्रवेश क्षमता | विद्यापीठ |
|---|---|---|---|---|
| १. | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय कोल्हापूर, जुना पुणे बंगलोर रोड, विद्यानगर, कोल्हापूर - ४१६ ००४ | आर्टिफिशिअल इंटेलिजेंन्स व डेटा सायन्स | ६० | डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे |
| | | कॉम्प्युटर सायन्स ॲन्ड इंजिनिअरींग | ६० | |
| | | इलेक्ट्रीकल इंजिनिअरींग | ६० | |
| | | इलेक्ट्रॉनिक्स ॲन्ड टेलिकम्युनिकेशन इंजिनिअरींग | ६० | |
| | | मेकॅनिकल ॲन्ड ऑटोमेशन इंजिनिअरींग | ६० | |
| | | एकूण : | ३०० | |

**अटी व शर्ती :-**

१) प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

२) सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक आहे.

३) सदर पदवी अभ्यासक्रमांचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार/ पध्दतीनुसार करण्यात येतील.

४) रॅगिंग संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट,१९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

५) याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६२६१२३३१६५४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL RAGHUNATH KATKAR

Digitally signed by ANIL RAGHUNATH KATKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, pseudonym=75C11252335D0BA578468AE6E544C11FDBC35C9A, serialNumber=2356D82C73E8A0C7B6DA68B6511197206B94720842CDA576FEBEBF84581FC52A, cn=ANIL RAGHUNATH KATKAR
Date: 2023.06.28 18:00:10 +05'30'

**(अनिल काटकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय, पुणे.
३. कुलसचिव, बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे
४. कक्ष अधिकारी (तांशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. कक्ष अधिकारी (तांशि-१/तांशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
६. संबंधित संस्था (संचालकांमार्फत)
७. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली -११०००१
८. सहाय्यक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), पश्चिम विभागीय कार्यालय, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, इंडस्ट्रियल इन्शुरस बिल्डींग, दुसरा मजला, चर्चगेट, मुंबई.
९. निवड नस्ती (तांशि-४)